**समाज कल्याण विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर असलेल्या पदांवर कार्यरत असलेल्या जिल्हा परिषदेतील कर्मचाऱ्यांच्या वेतनाबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन आदेश क्र.सकआ २०१४/प्र.क्र.३०६/आस्था २,**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०१९.

**वाचा:-** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ २०१४ / प्र.क्र.३०६ / आस्था २, दि.६.२.२०१८.
२) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र.सकआ/आस्था-६/जि.प.प्रतिनियुक्ती-कर्म.वेतन/ २०१९-२०/कां-६/१८९६, दि.२३.७.२०१९.
३) समाज कल्याण आयुक्तालयाचे पत्र क्र.सकआ/आस्था-६/जि.प.प्रतिनियुक्ती-कर्म. वेतन/ २०१९-२०/कां-६/१९६५, दि.९.८.२०१९.

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत असलेल्या योजना शासन निर्णय दि.४.११.२००० अन्वये जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत. सदर योजनांच्या अंमलबजावणी करिता सामाजिक न्याय विभागाच्या अधिपत्याखालील अधिकारी/ कर्मचारी जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत आहेत. सदर अधिकारी/ कर्मचारी यांच्या पदांचा समावेश या विभागाच्या आकृतिबंधामध्ये करण्यात आलेला आहे.

२. जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असणाऱ्या सामाजिक न्याय विभागाच्या कर्मचाऱ्यांची वेतन देयके यापुर्वी Off-line पध्दतीने जिल्हा परिषदेच्या वित्त विभागाकडून पारित करण्यात येत होती. त्याकरिता लागणारी आवश्यक तरतूद या विभागाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमध्ये संबंधित लेखाशिर्षाखाली ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली करण्यात येत होती. तथापि केवळ संगणकीय प्रणालीव्दारे कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याच्या वित्त विभागाच्या सूचनांनुसार कोषागार कार्यालयाव्दारे प्रचलित पध्दतीने Off-line देयके स्विकारण्यास नकार दिला होता. तसेच, जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असणाऱ्या या विभागाच्या कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते यांची देयके अदा करण्यामध्ये अडचणी निर्माण होत असल्याने ग्राम विकास विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने सदर कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते यांची देयके शासनाच्या सेवार्थ प्रणालीमधून आहरित करण्यास शासन आदेश दि.६.२.२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुषंगाने आवश्यक ती तरतूद करून माहे एप्रिल, २०१९ पासून सदर कर्मचाऱ्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून आहरित करण्यात येत आहे.

३. तथापी, या विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर एकूण पदांपैकी बरीचशी पदे रिक्त आहेत. सबब, सामाजिक न्याय विभागाच्या योजनांच्या अंमलबजावणी करिता या विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर जिल्हा परिषदेमधील अधिकारी/ कर्मचारी यांचीसुध्दा बरीचशी पदे रिक्त आहेत. जिल्हा परिषदेकडील सामाजिक न्याय विभागाच्या योजनांची अंमलबजावणी करण्याच्या

अनुषंगाने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्तरावरून या विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर पदांवर जिल्हा परिषदेकडील कर्मचाऱ्यांची नियुक्ती करण्यात येत असते. जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असणाऱ्या सामाजिक न्याय विभागाच्या कर्मचाऱ्यांची वेतन देयके यापुर्वी Off-line पध्दतीने जिल्हा परिषदेच्या वित्त विभागाकडून पारित करण्यात येत होती. त्यावेळी सदर कर्मचाऱ्यांकरिता करण्यात आलेल्या तरतूदीतून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्तरावरून या विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर पदांवर नियुक्त केलेल्या जिल्हा परिषदेकडील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते सुध्दा आहरित करण्यात येत होते.

४. या विभागांतर्गतच्या कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते यांची देयके “सेवार्थ” वेतन प्रणालीव्दारे अदा करण्यात येतात. त्याचप्रमाणे ग्राम विकास विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते यांची देयके “पंचायत राज सेवार्थ” प्रणालीव्दारे अदा केली जातात. सदर दोन्ही प्रणाल्या या स्वतंत्र असून यामध्ये एका प्रणालीतून अन्य प्रणालीमध्ये कर्मचारी स्थानांतरीत करण्याबाबतची कोणतीही तरतूद उपलब्ध नाही. तथापी, आता जिल्हा परिषदेमध्ये कार्यरत असणाऱ्या सामाजिक न्याय विभागाच्या कर्मचाऱ्यांची वेतन देयके सेवार्थ प्रणालीतून अदा करण्यात येत असल्याने तसेच त्याकरिता आवश्यक ती तरतूद ०१-वेतन या बाबीखाली करण्यात आली असल्याने मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या स्तरावरून या विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर पदांवर नियुक्त केलेल्या जिल्हा परिषदेकडील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्ते Off-line पध्दतीने अदा करण्यास जिल्हा परिषदांना अडचणी निर्माण झालेल्या आहेत.

५. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.१७.१२.२०१६ अन्वये शासकीय अधिकारी /कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीने नियुक्तीसाठी अटी व शर्ती आणि नियुक्तीची कार्यपध्दती याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे.

६. त्यानुषंगाने समाज कल्याण विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर असलेल्या समकक्ष पदांवर जिल्हा परिषदेतील कार्यरत कर्मचाऱ्यांचे वेतन काढण्याच्या अनुषंगाने शासन स्तरावरून आदेश निर्गमित करण्याबाबत समाज कल्याण आयुक्तालयाने दि.२३.७.२०१९ व दि.९.८.२०१९ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन आदेश</u> :-**

समाज कल्याण विभागाच्या आकृतिबंधामध्ये जिल्हा परिषदेमध्ये मंजूर असलेल्या पदांवर जिल्हा परिषदेतील जे समकक्ष कर्मचारी कार्यरत आहेत त्यांची नियुक्ती प्रतिनियुक्ती समजून त्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून अदा करण्यास प्रस्तुत आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर कर्मचाऱ्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून अदा करण्याबाबत खालीलप्रमाणे कार्यपद्धती अवलंबिण्यात यावी-

१) समाज कल्याण विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर असलेल्या पदांवर जिल्हा परिषदेतील सद्य:स्थितीत कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीस संबंधित जिल्हा परिषदांनी समाज कल्याण आयुक्तालयाची मान्यता घेतलेली नाही. समाज कल्याण आयुक्तालयाची मान्यता न घेतलेल्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत मा.प्रधान सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२७.९.२०१९ रोजी झालेल्या बैठकीत प्रतिनियुक्तीबाबतची कार्यवाही पूर्ण करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापी, सदर कार्यवाही पूर्ण करण्यास काही कालावधी लागणार आहे. तसेच दिपावली निमित्त

कर्मचाऱ्यांचे वेतन दिपावलीपूर्वी करण्यास अत्यंत अल्प कालावधी शिल्लक राहिलेला आहे. सबब, सदर कर्मचाऱ्यांचे माहे ऑक्टोबर, २०१९ पर्यंतचे वेतन प्रतिनियुक्तीबाबतची कार्यवाही दि.३० नोव्हेंबर, २०१९ पुर्वी पूर्ण करण्याच्या अधीन राहून करण्यास मान्यता देण्यात येत आहे. मात्र माहे नोव्हेंबर, २०१९ पासूनचे वेतन प्रतिनियुक्तीबाबतची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर अदा करण्यात यावेत.

२) राज्यातील जिल्हा परिषदेतील समाज कल्याण विभागाच्या मंजूर पदांवर जिल्हा परिषदेतील जे कर्मचारी आहेत. त्यापैकी भविष्य निर्वाह निधी लागू असलेल्या कर्मचाऱ्यांचे सेवार्थ प्रणालीतून ०१ वेतन या तपशीलवार उद्दिष्टाखाली वेतन देयक जनरेट करण्यात यावे. फक्त त्यांचे भविष्य निर्वाह निधी वजाती चलनाने जिल्हा परिषदेच्या खाती भरणा करण्यात याव्यात.

३) राज्यातील जिल्हा परिषदेतील समाज कल्याण विभागाच्या मंजूर पदांवर जिल्हा परिषदेच्या कर्मचाऱ्यांपैकी डीसीपीएस (एनपीएस) लागू असणाऱ्या कर्मचाऱ्यांचे नियमित सेवार्थ प्रणालीतून ०१ वेतन या तपशीलवार उद्दिष्टाखाली वेतन देयक जनरेट करताना अडचणी उद्भवू शकतात. कारण या कर्मचाऱ्यांना जिल्हा परिषदेकडून डीसीपीएस क्रमांक मिळालेला आहे व त्यांना एनएसडीएल कडून प्राण क्रमांक सुध्दा प्रदान करण्यात आलेला आहे. डीसीपीएस (एनपीएस) लागू असणाऱ्या प्रतिनियुक्तीच्या पदावरील कर्मचाऱ्यांचे बाबतीत नियमित सेवार्थ प्रणालीतून ०१ वेतन या तपशीलवार उद्दिष्टाखाली वेतन देयक जनरेट करण्याकरिता पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

A) प्रथम जिल्हा परिषदेतील डीसीपीएस (एनपीएस) लागू असणाऱ्या कर्मचाऱ्यांचा डेटा नियमित सेवार्थ प्रणालीत सहाय्यकाच्या लॉगीन मध्ये New Employee Configuration form मध्ये भरुन, सदर डेटा DDO ला Forward करावा व DDO कडुन असा डेटा, त्यापुढे कोषागाराकडे Forward करावा. सदर डेटा कोषागाराला ऑनलाईन प्राप्त झाल्यानंतर या डेटाला कोषागारामार्फत Approval देण्यात येवून संबंधित कर्मचाऱ्याला शासनाचा डीसीपीएस क्रमांक प्राप्त होईल.

B) शासनाचा डीसीपीएस क्रमांक प्राप्त झाल्यानंतर संबंधित कोषागारामार्फत सदर डीसीपीएस आयडी व संबंधित कर्मचाऱ्याचा यापुर्वीच प्राप्त झालेला प्राण क्रमांक मॅपिंग करण्यात यावा. सदर कार्यवाही ही संबंधित कर्मचाऱ्याचे अंशदान व शासन अंशदान एनएसडील कडे पाठविण्यासाठी कोषागारात जनरेट होणाऱ्या SCF फाईल साठी महत्वाची आहे. सदर फाईल मधून एकाच वेळी संबंधित कर्मचाऱ्याचे अंशदान व शासन अंशदान एनएसडील कडे पाठविले जाईल व ही रक्कम एनएसडीएल मार्फत संबंधित कर्मचाऱ्यांचे प्राण क्रमांकावर वर्ग केली जाईल.

C) प्रतिनियुक्ती पदावधी संपेपर्यंत संबंधित कर्मचाऱ्याच्या जिल्हा परिषदेतील डीसीपीएस क्रमांकावर कोणत्याही वजाती करण्यात येवू नयेत.

D) सदर कार्यवाही ही संबंधित कर्मचारी जोपर्यंत प्रतिनियुक्तीच्या पदावर असेल तोपर्यंतच अंमलात राहील. सदर कालावधी संपुष्टात आल्यानंतर शासनाकडील भरलेल्या माहितीची End of Service करुन संबंधित कर्मचाऱ्याचा डेटा संपुष्टात आणावयाचा आहे. व प्रत्यक्षात सदर कर्मचारी त्यानंतर जिल्हा परिषदेतील पदावर वर्ग झाल्यानंतर पुढील वजाती जिल्हा

परिषदेतील डीसीपीएस क्रमांकावर करण्यात यावा. व त्यानंतर संबंधित कर्मचाऱ्याचा प्राण क्रमांक सुद्धा त्यासोबत मॅपिंग करण्याची कार्यवाही करावी.

२. समाज कल्याण विभागाच्या आकृतिबंधामध्ये मंजूर असलेल्या समकक्ष पदांवर यापुढे जिल्हा परिषदेतील कर्मचाऱ्यांची प्रतिनियुक्ती शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.१७.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार तसेच शासनाने प्रतिनियुक्तीबाबत वेळोवेळी केलेल्या तरतूदींनुसार करण्यात यावी.

३. प्रस्तुत शासन आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौस-३५०/२०१९/कोषा-प्रशा-५, दि.२१.०९.२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१९१५१४२२७५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY GIRIDHAR PATIL

Digitally signed by SANJAY GIRIDHAR PATIL
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0f7d1eee7567d430eefd928eefa78ed2a6072c4ce8f3c0aa4efaf26d9c32daeb, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=bd10fe5a55495bc381e7b4d4b658250c74eb3f55113a21fd21c8620f04c2c257, ou=SOCIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SANJAY GIRIDHAR PATIL
Date: 2019.10.19 15:15:28 +05'30'

**(सं.गि.पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
३. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषद
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षण), मुंबई/ नागपूर, १/२
७. सहसंचालक (सुधारणा), लेखा व कोषागारे, नविन प्रशासन भवन, मुंबई.
८. सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
९. जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
१०.सह /उप सचिव (कोषा-५/अर्थसंकल्प/ व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सह /उप सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१३.निवड नस्ती (आस्था-२)